**<u>प्रशासकीय मान्यता.</u>**

**अॅडव्होकेट्स चेंबर्स रुल्स, २०१३ मधील तरतुदीनुसार, मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबादच्या वकील संघामार्फत बांधल्या जाणाऱ्या ५१० चेंबर्सपैकी, सरकारी वकील कार्यालयासाठी राखून ठेवण्यात आलेल्या ५१ चेंबर्सच्या बांधकाम खर्चाची शासनाच्या सहभागाची रु.३.०६ कोटी रक्कम वकील संघास प्रदान <u>करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. सवऔ-२१२० /प्र.क्र. ०८/२०/का-८**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक :- २३ मे, २०२२

<u>वाचा</u> :- १) मा.मंत्री, उद्योग, खनिकर्म, मराठी भाषा, महाराष्ट्र शासन यांचे दि.२१.१.२०२० रोजीचे पत्र.

२) अॅडव्होकेट्स असोसिएशन ऑफ बॉम्बे, उच्च न्यायालय इमारत, खंडपीठ औरंगाबाद यांचे दि. निरंकचे माहे जानेवारी २०२० मधील पत्र.

३) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा औरंगाबाद यांचे क्र.२५४ / २०२०, दि.१८.०२.२०२०रोजीचे पत्र.

४) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.एचसीटी-२००७/१२३९/२०३)/डी-४, दि.१८.०२.२०२१.

५) विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा औरंगाबाद यांचे जा.क्र.१०९३/२०२१, दि.२३.०८.२०२१रोजीचे पत्र.

६) सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र.आस्था-२०२१/ प्र.क्र.२२ / १४९१, दि.२३.१२.२०२१.

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, पदमपुरा परिसर, औरंगाबाद-४३१००५ यांचे पत्र, जा.क्र.तांशा / उ.न्या.से. केंद्र / २५३ / २०२१, दि.२२.१२.२०२१.

८) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५.

९) प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.एचसीटी-२००७/१२३९/(२०३)/का.४, दि.०८.०९.२००८.

**<u>प्रस्तावना</u>**:-

सिटी अॅन्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन ऑफ महाराष्ट्र लिमिटेड (सिडको), औरंगाबाद आणि महाराष्ट्र शासन, सह सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, शाखा औरंगाबाद यांच्यामध्ये दि.२६.०३.१९८४ रोजी झालेल्या ९० वर्षांकरिताच्या भाडे करारनाम्यानुसार औरंगाबाद येथील एकूण

५७.५० एकर जमीन भाडेकराराने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांना मिळालेली आहे. त्यापैकी, २.७१४ एकर जमीन राज्य शासनाने मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबादच्या वकील संघास वकीलांचे चेंबर्स बांधण्यासाठी दि.०८.०९.२००८ रोजीच्या पत्रान्वये काही अटी व शर्तीवर दिलेली आहे. सदर जमिनीवर ५१० चेंबर्स बांधण्याचा प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पासंदर्भातील, "ॲडव्होकेट्स चेंबर्स रुल्स, २०१३” ला शासनाने, दि.१८.०२.२०१३ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिलेली आहे. सदर, ॲडव्होकेट्स चेंबर्स रुल्स, २०१३ मधील तरतूदीनुसार, प्रकल्पात एकूण बांधण्यात येणाऱ्या ५१० चेंबर्सच्या १०% म्हणजेच ५१ चेंबर्स सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांच्याकरिता राखीव ठेवण्यात आलेले आहेत. सदर ५१ चेंबर्सच्या बांधकाम खर्चापोटी प्रती चेंबर रु.१३ लक्ष प्रमाणे ५१ चेंबर्ससाठी एकूण रु.६.६३ कोटी इतक्या बांधकाम खर्चाची शासनाच्या सहभागाची रक्कम प्रदान करण्याची मागणी वकील संघ, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी संदर्भ क्र.२ येथील माहे २०२० मधील पत्रान्वये केलेली आहे. त्यानुषंगाने, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी अंदाजपत्रकाची छाननी करुन बांधकाम खर्चापोटी रु. ६ लक्ष प्रती चेंबरप्रमाणे एकूण५१ चेंबर्सकरिता रु.३०६ लक्ष (रु.३.०६ कोटी) इतकी रक्कम परिगणित केलेली आहे.

२. मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांच्याकरिता बांधकामात राखून ठेवलेल्या ५१ चेंबर्सच्या बांधकाम खर्चाच्या सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित व प्रमाणित केलेल्या रु.३०६ लक्ष (रु.३.०६ कोटी) रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

ॲडव्होकेट्स चेंबर्स रुल्स, २०१३ मधील तरतुदीनुसार मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथील वकील संघामार्फत बांधण्यात येत असलेल्या ५१० चेंबर्सच्या प्रकल्पात, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, यांच्याकरिता राखून ठेवण्यात आलेल्या ५१ चेंबर्सच्या बांधकाम खर्चापोटी प्रती चेंबर रु. ६ लक्ष प्रमाणे, एकूण ५१ चेंबर्सकरिता रु.३०६ लक्ष (रु.३.०६ कोटी) (अक्षरी रुपये तीन कोटी सहा लक्ष फक्त) रकमेच्या सार्वजनिक बांधकाम विभागाने परिगणित व प्रमाणित केलेल्या अंदाजपत्रकास, अर्थसंकल्पात प्रत्यक्षात निधी उपलब्ध झाल्याशिवाय खर्च करण्यात येऊ नये, या अटीच्या अधीन राहून, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. याप्रित्यर्थ होणारा खर्च, "विधि व न्याय विभाग मागणी क्र.जे-१, लेखाशीर्ष २०१४ न्यायदान, ११४ विधि सल्लागार व समुपदेशी, (००)(०१) विधि सल्लागार व समुपदेशी (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य), (१३) कार्यालयीन खर्च (संगणक संकेतांक क्र.२०१४०२९९)" खाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सार्वजनिक बांधकाम विभागाने, त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ११/२०२२/इमारती-२, दि.०१.०२.२०२२अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन, त्याचप्रमाणे, वित्त विभागाने दिलेल्या निर्देशानुसार, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम (भाग-२), दि. १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-५ मधील अ.

क्र.१, नियम क्र. १३४ (महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकांतर्गतचे नियम) मधील तरतूदीनूसार, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन, प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, यांच्या मान्यतेने, हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२२०५२३१६३७५४५५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajesh Bajirao Ghadge

Digitally signed by Rajesh Bajirao Ghadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c5b798a11a32ce7e489321386f81cf7601190d7425341cd11b001ffa614b0a28, serialNumber=5d6f97dbfefd0a526c757773ea06ac43b9d1dc7c582c6f4747cd504e990f85ff, cn=Rajesh Bajirao Ghadge
Date: 2022.05.23 16:39:40 +05'30'

**( रा. बा. घाडगे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
४. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सचिव (बांधकामे/इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रबंधक, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
१२. सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
१३. आस्थापना अधिकारी, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
१४. कक्ष अधिकारी (कार्यासन-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. कक्ष अधिकारी (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. अध्यक्ष, ॲडव्होकेट्स असोसिएशन ऑफ बॉम्बे, उच्च न्यायालय इमारत, खंडपीठ औरंगाबाद, जालना रोड, सिडको, औरंगाबाद-४३१००१.
१७. निवडनस्ती/ कार्या.८.